**आर्थिक वर्ष २०२० अखेर मार्च महिन्यात सर्व प्रशासकीय विभाग तसेच अधिदान व लेखा कार्यालय/ कोषागारे / उपकोषागारे यांनी करावयाच्या कार्यवाहीबाबत सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण २०२०/प्र.क्र. ४२/२०/कोषा प्रशा-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १३ मार्च, २०२०.

**संदर्भ** :-१) शासन परिपत्रक क्र.: संकीर्ण २०१९/ प्र.क्र.३३/२०१९/कोषा प्रशा-५, दि.७ मार्च, २०१९.
२) शासन परिपत्रक क्र.: संकीर्ण २०१९/ प्र.क्र.३३/२०१९/कोषा प्रशा-५, दि.२७ मार्च, २०१९.

**शासन परिपत्रक-**

दरवर्षी मार्च महिन्यात अर्थसंकल्पीय अधिवेशनात पूरक मागणीद्वारे व सुधारीत अंदाजपत्रकाद्वारे विविध विभागांना निधी उपलब्ध करुन दिला जातो. सदर उपलब्ध झालेला निधी ३१ मार्च अखेर कोषागार / उपकोषागार तसेच अधिदान व लेखा कार्यालय येथे देयके सादर करुन खर्च करणे अनिवार्य असल्यामुळे अधिदान व लेखा कार्यालय तसेच कोषागार / उपकोषागार कार्यालयात मार्च महिन्यात सादर होणाऱ्या देयकांच्या संख्येत मोठ्या प्रमाणात वाढ होते. त्यामुळे ट्रेझरी नेट, बिम्स व सेवार्थ इ. प्रणालींवर ताण येऊन त्या खंडीत होण्याचे व वेग मंदावण्याचे प्रकार घडतात. तसेच देयकांची तपासणी करण्यास पुरेसा कालावधी मिळत नाही. याशिवाय उपकोषागार स्तरावर रात्री उशिरा सादर होणारी देयके, बँकेच्या कामाच्या वेळांमुळे पारित करता येत नाहीत. अशाप्रकारे माहे मार्च अखेर नेहमी उदभवणाऱ्या अडचणींवर मात करण्यासाठी सर्व प्रशासकीय विभाग त्यांच्या अधिनस्त सर्व कार्यालये, आहरण व संवितरण अधिकारी तसेच अधिदान व लेखा कार्यालय/ सर्व कोषागारे / उपकोषागारे यांनी खालीलप्रमाणे कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी.

**१) दि. ३१ मार्च, २०२० रोजी अधिदान व लेखा कार्यालय तसेच कोषागार / उपकोषागार कार्यालयातील देयके स्वीकृती व प्रदानाचे काऊंटर सुरु ठेवणे बाबत :-**

वर्ष अखेर शासनाचा निधी अखर्चित राहू नये यासाठी अधिदान व लेखा कार्यालय, तसेच जिल्हा कोषागार कार्यालये व उपकोषागार कार्यालये दि ३१ मार्च, २०२० रोजी रात्री उशिरापर्यंत चालू ठेवणे आवश्यक आहे. त्यामुळे सदर दिवशी देयके स्वीकृती व प्रदानाची कामे पूर्ण करता येतील.

**२) दि. ३० मार्च, २०२० रोजी शासकीय प्रदाने धनादेशा द्वारे करण्यास मंजूरी देणे :-**

दि. ३१ मार्च, २०२० रोजी भारतीय स्टेट बँक तसेच शासनाचे आर्थिक व्यवहार हाताळणा-या अन्य बँकाच्या शाखा रात्री उशिरापर्यंत उघडया राहिल्या, तरी रात्री १२.०० नंतर बँकांच्या संगणकीय प्रणालीतील दिनांकात बदल होत असल्याने व्यवहार पुढील दिनांकास नोंदविला जातो. त्यामुळे शासनाचे व्यवहाराचे अचूक लेखांकन होण्याकरीता दि. ३० मार्च, २०२० पासून सर्व कोषागार कार्यालये शासकीय प्रदाने धनादेशाद्वारे करतील व उपकोषागार कार्यालये बँक मुखांकनाद्वारे शासकीय प्रदाने करतील. सर्व कोषागार व उपकोषागार कार्यालय

यांनी दिनांक २९ मार्च, २०२० पर्यंत सी.एम. पी. प्रदान प्रणाली मार्फत केलेली सर्व प्रदाने त्यांच्या आहरण व संवितरण अधिका-यांकडून प्राधिकृत करण्याची दक्षता घ्यावी. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई करीता दि ३१ मार्च, २०२० रोजी करण्यात येणाऱ्या प्रदानांबाबत स्वतंत्रपणे आदेश संचालनालयाद्वारे निर्गमित करण्यात येतील.

**३) अधिदान व लेखा कार्यालय / कोषागार/ उपकोषागार कार्यालयाकडून या पूर्वीची आक्षेपित देयके दि. २० मार्च, २०२० पूर्वी अधिदान व लेखा कार्यालय/ कोषागार/ उपकोषागारात सादर करणे :-**

माहे एप्रिल, २०१९ ते फेब्रुवारी, २०२० या कालावधीत म्हणजेच दि १ मार्च, २०२० पूर्वी कोषागारांनी आक्षेपित केलेली देयके वर्ष अखेरीस एकत्रित सादर केली जातात. देयकांची प्रंचड संख्या पाहता देयकांची काटेकोर तपासणी करणे कोषागार अधिका-यांना वेळेअभावी शक्य होत नसल्याने त्यात अनियमितता घडू शकते. त्यामुळे कोषागारांकडून दि १ मार्च, २०२० पूर्वी आक्षेपित झालेली, दिर्घ काळापासून कोषागारात पुन्हा सादर न केलेली सर्व देयके सर्व आहरण व संवितरण अधिकारी यांनी दि २० मार्च, २०२० पर्यंतच अधिदान व लेखा कार्यालय/ कोषागार/उपकोषागारात सादर करावी व त्यांनतर अशा प्रकारची देयके स्विकारली जाणार नाहीत.

प्रशासकीय विभांगाकडे उपलब्ध असलेल्या अनुदानाची खालील बाबींची देयके दि २० मार्च, २०२० पर्यंत अधिदान व लेखा कार्यालय, कोषागार /उपकोषागार कार्यालयात सादर करण्यात यावीत.

१.प्रवास भत्ता देयके.

२. आस्थापना विषयक पुरवणी देयके.

३. वैदयकीय खर्च प्रतीपूर्ती देयके.

त्यांनतर अशी देयके पुढील वर्षाच्या अनुदानातून काढण्यात यावीत.

पुरवणी मागण्या ( मार्च -२०२०) व सुधारीत अंदाजपत्रकानुसार उपरोक्त बाबींसाठी मंजूर झालेल्या अनुदानाचीच देयके दि २० मार्च, २०२० नंतर कोषागारात स्वीकारण्यात येतील.

४) **प्रपत्र बिजक ( Proforma Invoice ) जोडून सादर होणा-या देयकांबाबत :-**

मार्च महिन्याच्या अखेरीस उपलब्ध निधी खर्च करण्याचे हेतूने माल/वस्तू प्राप्त झालेल्या नसताना म.को.नि. नमुना ३१ अथवा प्रपत्र बिजक **( Proforma Invoice )** जोडून देयके सादर केली जातात. शासन वित्त विभाग परिपत्रक दि १४ मार्च, २०१८ अन्वये अधिदान व लेखा कार्यालय/ कोषागार / उपकोषागार कार्यालयांनी काय कार्यवाही करावी, याबाबतचे निर्देश देण्यात आलेले आहेत. त्यानुसार आता म. को. नि. नियम १९६८ मधील नियम ३०२ व ३०३, महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम १९६५ च्या परि. १ मधील विवरणपत्र २ मध्ये नमूद केलेल्या बाबींसाठीच संक्षिप्त देयकांवर रक्कम काढण्याच्या अनुषंगाने पुढील प्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

अ) म. को. नि.नमुना ३१ अथवा २८ मध्ये प्रपत्र बिजक ( Proforma Invoice ) जोडून देयके सादर केली असतील तर अशी देयके पारित करण्यात येऊ नयेत.

ब) पुरवठादाराकडून खरेदी केलेल्या वस्तुंचा पुरवठा करण्यात आला असेल व म. को. नि. नमुना २८ अथवा ३१ सोबत अंतिम देयक ( Final Bill ) /नियमित प्रमाणके / पावत्या जोडल्या असतील तरच देयके पारित करावीत.

वरील (अ) व (ब) मध्ये नमूद केल्याप्रमाणे वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२०/ प्र.क्र.४/२०/ कोषा.प्रशा.५, दि. ३०.०१.२०२० मधील तरतुदी नुसार कार्यवाही करण्यात यावी.

**५) जिल्हा कोषागार स्तरावर सादर होणे आवश्यक असणारी देयके उपकोषागार स्तरावर सादर न करणे :-**

सुधारीत अंदाजपत्रक व पुरवणी मागणीद्वारे प्राप्त अनुदानातून वैयक्तीक लाभाची मोठया रकमेची देयके महसूल विभाग, कृषी विभाग, आदिवासी विकास विभाग इ. कार्यालयाकडून तालूका स्तरावर अनुदान वाटप करुन उपकोषागार कार्यालयामध्ये वर्ष अखेरीस सादर केली जातात. उपकोषागार स्तरावर एकच लिपीक व एकच उपलेखापाल / सहायक लेखाअधिकारी कार्यरत असल्यामुळे अशा देयकांची छाननी करण्यावर मर्यादा येतात व अनियमितता घडण्याचा संभव असतो. त्यामुळे अशी देयके उपकोषागार कार्यालयात सादर न करता जिल्हा कोषागार कार्यालयामध्येच सादर करण्यात यावीत. उपकोषागार स्तरावरील सर्व आहरण व संवितरण अधिका-यांना याबाबत लेखी स्वरुपात सूचना द्याव्यात.

**६) उपकोषागारामध्ये दि. ३१ मार्च, २०२० रोजी सांयकाळी ०६.०० नंतर देयके स्वीकृती बंद करुन लेखे जिल्हा कोषागारात सादर करणे :-**

उपकोषागारात प्राप्त होणारी देयके, त्या देयकांवर उपकोषागाराकडून करावयाच्या कार्यवाहीस लागणारा अवधी व बँकेच्या कामाचा कालावधी पहाता उपकोषागारात दि. ३१ मार्च, २०२० रोजी सांयकाळी ०६.०० नंतर देयके स्वीकृती बंद करण्यात येईल. दि. ३१.०३.२०२० रोजी सांयकाळी ०६.०० नंतर कोकण भवन, उपकोषागार कार्यालय वगळता इतर उपकोषागार स्तरावरील आहरण व संवितरण अधिकारी यांनी त्यांचे जिल्हा स्तरावरील आहरण व संवितरण अधिकारी यांचे मार्फत जिल्हा कोषागारात देयके सादर करण्याची दक्षता घ्यावी. याबाबत सर्व उपकोषागारांमध्ये सूचना फलकावर सूचना लावण्यात याव्यात.

**७) अर्थसंकल्पीय प्रणालीतून उणे प्राधिकार पत्र बंद करणे :-**

शासनाच्या आर्थिक व्यवहारात विलंब टाळण्याच्या दृष्टीने ठराविक प्रकारच्या उद्दीष्टांवर खर्च करण्याकरीता अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीतून उणे प्राधिकार पत्र निर्गमित करण्याची मुभा प्रणालीत ठेवण्यात आलेली आहे. आठमाही सुधारीत अंदाजपत्रकानूसार निधी प्राप्त झाल्यानंतर अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीमधून उणे प्राधिकार पत्र निर्गमित होणे बंद करण्यात येईल. तथापि, उणे प्राधिकार पत्रासह देयके सादर झाल्यास अशा देयकांबाबत कोषागार अधिकारी यांनी संचालनालय, लेखा व कोषागारे यांना तात्काळ अवगत करावे व त्यांच्याकडून आदेश प्राप्त झाल्याशिवाय अशी देयके पारीत करु नये.

८) **नियंत्रक अधिका-यांनी पुरवणी मागणीद्वारे प्राप्त अनुदान त्वरीत बिम्स ( BEAMS ) प्रणालीवर उपलब्ध करुन देणे :-**

शासनाकडून विविध विभागांना आठमाही सुधारीत अंदाजपत्रकानूसार तसेच पुरवणी मागण्याद्वारे अनुदान मंजूर केल्यानंतर प्रशासनिक विभाग व विभाग प्रमुखांकडून बिम्स (BEAMS) प्रणालीवर आहरण व संवितरण अधिका-यांना उशिराने अनुदान उपलब्ध करुन दिले जाते, त्यानंतर देयके तयार करणे, कोषागारात सादर करणे इत्यादी कार्यवाही करण्यास विलंब होतो. त्यामुळे दि. ३१ मार्च रोजी बिम्स (BEAMS) प्रणाली तसेच ट्रेझरी नेट प्रणाली यावर प्रचंड ताण येऊन या प्रणाली बंद पडतात अथवा खंडीत होतात. त्याकरीता सर्व विभागांनी /नियंत्रण अधिकारी यांनी सुधारीत अर्थसंकल्पाद्वारे तसेच पुरवणी मागणीद्वारे प्राप्त अनुदान बिम्स (BEAMS) वर त्वरीत उपलब्ध करुन देण्याची दक्षता घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून,त्याचा संकेतांक २०२००३१३१७१८३९४३०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

INDRAJEET SAMBHAJI GORE

Digitally signed by INDRAJEET SAMBHAJI GORE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=6015944fe7d58a83f4a54c43147b5da1e34861e2984e9f793b66f7249aaa9c1a, postalCode=400032, street=Y-5/66,GOVERNMENT COLONY,MUMBAI, serialNumber=d4994742192306fcc1dea9aadd3810639506519fa652b919767b98b04e905a18, ou=FINANCE DEPUTY SECRETARY, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=INDRAJEET SAMBHAJI GORE
Date: 2020.03.13 17:21:38 +05'30'

**( इंद्रजित गोरे )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२. सर्व सन्माननीय विधानसभा / विधान परिषद सदस्य.
३. मा.राज्यपालांचे सचिव,
४. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
५. मा.उपमुख्यमंत्री यांचे कार्यालय,
६. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
७. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
८. मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिनस्त असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख
९. प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
१०. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
११. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
१२. महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१४. आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२
१५. आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन*, नागपूर ४४४००१

१६. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१८. सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
१९. प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
२०. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२१. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२२. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२३. सर्व विभागीय आयुक्त
२४. सर्व जिल्हाधिकारी
२५. सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२६. संचालक , लेखा व कोषागारे, मुंबई
२७. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई
२८. सर्व कोषागारे / उपकोषागारे,
२९. संचालक,स्थानिक निधी लेखापरिक्षा,कोकणभवन,नवीमुंबई.
३०. सहसंचालक,लेखा व कोषागारे,कोकण/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/ अमरावती
३१. सहसंचालक,स्थानिक निधी लेखापरिक्षा मुंबई /पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती
३२. वित्त विभागातील सर्व कार्यासने
३३. निवड नस्ती कोषा प्र.५.